**कोवीड-१९ या साथीच्या प्रादुर्भावामुळे करण्यात आलेल्या लॉकडाऊन कालावधीत झालेली आर्थिक तूट भरुन काढण्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्यादित (महावितरण) द्वारे विविध वित्तीय संस्थांकडून उभारण्यात येणाऱ्या/आलेल्या कर्जाच्या व त्यावरील व्याजाच्या रकमेस शासन हमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०२१/ उउकावि /प्र.क्र.६६/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- ०३ जानेवारी, २०२२

वाचा -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८
३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्रक्र.१७१/उर्जा-५, दि.२४.७.२०२०

**प्रस्तावना:**

कोवीड-१९ या साथीच्या प्रादुर्भावामुळे करण्यात आलेल्या लॉकडाऊन कालावधीत महाराष्ट्रातील वीजेची दररोजची सरासरी मागणी २३००० मेगावॅट वरुन १६००० मेगावॅट इतकी कमी झाली होती. पुरेशी विजेची उपलब्धता, गुणवत्ता राखणे व सर्वांसाठी वीज या मुख्य योजनेच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने औद्योगिक व वाणिज्यिक ग्राहकांना दिलेल्या सवलती तसेच शासनाच्या सवलती पाहता महानिर्मिती, महापारेषण व महावितरण कंपनीस आर्थिक समस्येला तोंड द्यावे लागणार आहे. परिणामी आर्थिक तूट भरुन काढण्यासाठी राज्यातील शासकीय वीज कंपन्यांना रु.२०,०००/- कोटीच्या मर्यादेत विविध वित्तीय संस्थांकडून कर्ज घेण्यास शासन हमी देण्याच्या व सदर शासन हमीवरील हमीशुल्क माफ करण्याच्या उर्जा विभागाच्या प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने दि.९.६.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मंजूरी दिलेली असून त्यानुषंगाने करण्यात यावयाच्या कार्यवाही संदर्भात शासन निर्णय दिनांक २४.७.२०२० रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णयानुसार शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जाची रक्कम आणि अनुषंगिक अटी व शर्ती निश्चित करण्यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात आलेली आहे. सदर समिती समोर उर्जा विभागाने महावितरण कंपनीस विविध वित्तीय संस्थांकडून एकूण रु.८५०० कोटी कर्ज व त्यावरील रु.२९०१ कोटी व्याज असे एकूण रु. ११४०१ कोटी रकमेस हमी देण्याचा प्रस्ताव सादर केला होता. त्यास उच्चाधिकार समितीने दिनांक ७ डिसेंबर, २०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने एकूण रु.११४०१ कोटी रकमेस शासन हमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोवीड-१९ या साथीच्या प्रादुर्भावामुळे करण्यात आलेल्या लॉकडाऊन कालावधीतील आर्थिक तूट भरुन काढण्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्यादित (महावितरण) द्वारे खालील तक्यात नमूद वित्तीय संस्थांकडून उभारण्यात आलेल्या/ येणाऱ्या एकूण रु.८५०० कोटी कर्ज व त्यावरील रु.२९०१ कोटी व्याज असे एकूण रु.११४०१ कोटी (अक्षरी रुपये अकरा हजार चारशे एक कोटी फक्त ) इतक्या रकमेस शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वित्तीय संस्था | कर्जाची रक्कम (रु. कोटी) | व्याजाची रक्कम (रु. कोटी) | एकूण हमीची रक्कम (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | आरईसी लि. | २५०० | १७०७ | ४२०७ |
| २ | बँक ऑफ महाराष्ट्र | ९०० | २१३ | १११३ |
| ३ | युनियन बँक ऑफ इंडिया | १००० | २२९ | १२२९ |
| ४ | युको बँक | ५०० | १११ | ६११ |
| ५ | बँक ऑफ इंडिया | १००० | २२२ | १२२२ |
| ६ | पंजाब नॅशनल बँक | २००० | २८८ | २२८८ |
| ७ | युको बँक | ६०० | १३१ | ७३१ |
| | **एकूण** | **८,५००** | **२,९०१** | **११,४०१** |

२. सदर शासन हमीवर कर्ज उचलण्याची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३. धनको बँक/वित्तीय संस्थेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या/आलेल्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

३.१) शासन हमी एकूण रु.११,४०१ कोटी इतक्या रकमेपुरतीच सिमीत राहील.

३.२) महावितरणने आर्थिक संस्थांकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.३) महावितरण कंपनीकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची सूचना शासनास ९० दिवसाच्या आत देणे संबंधित वित्तीय संस्थेस बंधनकारक असेल.

३.४) धनको संस्था ही राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महावितरण कंपनीला आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको अन्य कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

३.५) धनको संस्थांकडून घेण्यात आलेल्या कर्जातून निर्माण होणारी भविष्यातील मालमत्ता ही तारण म्हणून ठेवण्यात यावी.

३.६) महावितरण कंपनीकडून कर्ज फेडीत कसूर झाल्यास महावितरण कंपनीच्या तारण चल/ अचल मालमत्तेची विक्री / लिलाव ( Auction ) करुन कर्ज वसुलीची प्रक्रिया पूर्ण करावी. तसेच, कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय संबंधित वित्तीय संस्थेला हमीपूर्ततेकरिता शासन हमीची प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही.

३.७) धनको कडून महावितरण कंपनीच्या तारण चल / अचल मालमत्तेची विक्री वसुलीचा निर्णय झाल्यास त्यासाठी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये उद्योग उर्जा व कामगार विभाग व वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. तारण चल / अचल मालमत्तेची विक्री/ लिलाव करताना मुल्यांकन त्रयस्थ संस्थेकडून शासन नियमानुसार करणे आवश्यक राहील. तसेच, उक्त

समितीमधील शासनाच्या दोन्ही प्रतिनिधींच्या अहवालासह लिलाव प्रक्रियेचे अंतिमीकरणास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

वरील (३.१) ते (३.७) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

**४.** महावितरण कंपनीस रु.११,४०१ कोटीची शासन हमी संदर्भाधिन अ.क्र. १ येथील दि.५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

४.१) महावितरण कंपनी ही Principal Debtor राहील.

४.२) सदर धनको कडून घेण्यात येणा-या कर्जाचा वापर ज्या उद्दीष्टासाठी कर्ज घेण्यात आले आहे त्यासाठीच करण्यात यावा.

४.३) महावितरण कपंनीकडून पुरेशा मत्तेची प्रतिभूती (Security) घेतल्यानंतरच धनको बँका कर्ज मंजूर करतील. सदर मत्तेची तपासणी वेळोवेळी व कमीत कमी सहा महिन्यातून एकदा तरी संबंधित बँक करेल.

४.४) महावितरण कंपनीने आवश्यक तेवढयाच कर्जाची उचल करावी.

४.५) महावितरण कंपनीद्वारे वित्तीय संस्थांकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाच्या व्याजदरात समानता होण्याच्या दृष्टीने संबंधित बँकां/वित्तीय संस्थांसमवेत वाटाघाटी करण्याची तसेच, REC या वित्तीय संस्थेकडून घेण्यात आलेल्या/येणाऱ्या कर्जावरील व्याजदर जास्त असल्याने इतर वित्तीय संस्थांकडून स्वस्त दराने कर्ज उभारणी करुन REC कडील कर्जाची परतफेड करणे किंवा REC समवेत वाटाघाटी करुन व्याजदर कमी करुन घेण्याबाबत उच्चस्तर समितीने दिलेल्या सूचना नुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी महावितरण कंपनीची / उद्योग उर्जा व कामगार विभागाची राहील.

४.६) सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज ) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

४.७) सदर शासन हमीवर देण्यात आलेल्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही याबाबत उद्योग उर्जा व कामगार विभागाने दक्षता घ्यावी.

४.८) महावितरण कंपनीने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती उद्योग उर्जा व कामगार विभागाकडे / वित्त विभागाकडे सादर करावी.

४.९) महावितरण कंपनीने विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

४.१०) महावितरण कंपनी त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर सहा महिन्यांनी (३१मार्च/३०सप्टेंबर) उद्योग उर्जा व कामगार विभागास सादर करेल.

५. **<u>हमी शुल्क</u>**

मा.मंत्रिमंडळाने निर्णय घेतल्यानुसार सदर शासन हमीवरील हमीशुल्क माफ करण्यात येत आहे. तथापि, शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

**६.** हा शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या नस्ती क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१७१/उर्जा-५ (भाग-१) वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.४/२०२१-२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** महावितरण कंपनीस कर्ज घेण्याच्या अनुषंगाने संबंधित वित्तीय संस्थांसोबत करण्यात येणाऱ्या करारपत्रांवर स्वाक्षरी करण्याकरिता उद्योग उर्जा व कामगार विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०१०३१५३९४१३२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DIPAK DASHRATH SURYAWANSHI

Digitally signed by DIPAK DASHRATH SURYAWANSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fcb20878461f686a9706b2be4b6f7e02acaecaa080bc2588b3514d6e3616c18c, pseudonym=CE2A31871B0CC225853F694CF76C9D51748F7677, serialNumber=BBADD444B09EA9B9BD37166340BEEBDF87E6A5F9553F01CA029FBD5F36983862, cn=DIPAK DASHRATH SURYAWANSHI
Date: 2022.01.03 15:42:21 +05'30'

**( दिपक द. सुर्यवंशी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
९) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती )
१४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.
१५) इंडियन नॅशनल कॉग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
१६) नॅशनॅलिस्ट कॉग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई.
१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
१८) बहुजन समाज पार्टी, महाराष्ट्र राज्य, बी.एस.पी. भवन, प्लॉट नं.८३-अे, कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-४०००१४.
१९) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-०४.

२०) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-२८.

२१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.

२२) प्रधान सचिव (उर्जा), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, प्लॉट नं.जी-९, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१.

२४) वित्त विभाग (साउ /व्यय-१६ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.

२५) कार्यासन अधिकारी-उर्जा-५, उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.

२६) संबंधित वित्तीय संस्था (विभागामार्फत).

२७) निवड नस्ती -अर्थबळ.

-----------

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| **9** Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| **10**. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| **11.** Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| **12.** Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| **13.** If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| **14**. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| **15.** Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |